कृषि क्षेत्रात भांडवली गुंतवणूक, पायाभूत सुविधा निर्मितीवर भर देणारी योजना राबविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक प्रपीवियो-२०२५/प्र.क्र.६६/११-अे,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ९ मे, २०२५.

वाचा :-

१) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दि.२०.३.२०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त
२) मा. मंत्रिमंडळाच्या दि.२९.०४.२०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त दि. ०८.०५.२०२५.

प्रस्तावना :-

मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दि.२०.३.२०२५ रोजी झालेल्या बैठकीत, सद्य:स्थितीत सुरू असलेल्या सर्वसमावेशक पीकविमा योजनेत बदल केल्यावर, बचत होणाऱ्या शासकीय निधीमधून, कृषी क्षेत्रात भांडवली गुंतवणूक वाढवून, कृषी क्षेत्राकरिता पायाभूत सुविधा निर्मितीवर भर देणारी नवीन योजना तयार करण्याबाबत, निर्देश देण्यात आले आहेत.

वाढत्या वातावरणातील बदलांमुळे येत असलेल्या विविध आपत्तींना तोंड देण्यासाठी शेतक-यांना सक्षम बनविणे आवश्यक आहे. सदर उद्देश साध्य करण्यासाठी राज्य शासनाने २०१८ पासून राज्यातील १६ जिल्ह्यांतील ५२२० गावात “नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्पाची” सुरुवात केलेली आहे. सदर प्रकल्प जागतिक बँक अर्थसहाय्यित असून त्याचा उद्देश, “हवामान बदलांना तोंड देण्यासाठी आणि अल्पभूधारक शेतकऱ्यांच्या शेती प्रणालीची नफाक्षमता वाढविणे” असा आहे. या प्रकल्पात शेतक-यांना त्यांच्या गरजांप्रमाणे आणि प्रामुख्याने त्यांच्या शेती क्षेत्रावर भांडवली गुंतवणूक करण्यासाठी, प्रकल्पातील घटकांचे लाभ, थेट लाभ हस्तांतरण (Direct Benefit Transfer) तत्त्वावर घेता येतात. विशेष म्हणजे या प्रकल्पात संपृक्तता मोड (Saturation Mode) या प्रणालीचा अवलंब करण्यात आला आहे. सदरहू प्रकल्पाच्या माध्यमातून सर्व गरजू शेतक-यांना त्यांच्या मागणीप्रमाणे शेतीसाठी आवश्यक विविध सुविधा, विविध योजना यांचे लाभ दिले जातात.

“जागतिक बँक अर्थसहाय्यित नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प” या प्रकल्पाचा पहिला टप्पा यशस्वीपणे पूर्ण झाला असून, शासनाने दुसऱ्या टप्प्याला मान्यता दिलेली आहे. दुसऱ्या टप्प्यात २१ जिल्ह्यांतील ७२०१ गावांचा समावेश आहे. अशाप्रकारे, राज्यातील १२,००० पेक्षा अधिक गावे ह्या योजनेत समाविष्ट झालेली आहेत. मात्र लोकप्रतिनिधींकडून उर्वरित गावांचा देखील समावेश या प्रकल्पात करण्याबाबत सातत्याने मागणी करण्यात येत आहे. त्यातून शेतक-यांना त्यांच्या शेतात भांडवली गुंतवणूक

करण्याची आग्रही मागणी असल्याचे दिसून येत आहे. मात्र, त्यासाठी केंद्राच्या आणि राज्याच्या विविध योजनांतून पुरेसा निधी उपलब्ध होत नाही. परिणामी शेतकऱ्यांना शेतीसाठी आवश्यक सुविधा, शेतीत करावयाची गुंतवणूक यासाठी उपलब्ध निधीच्या मर्यादेत शासकीय मदत दिली जाते. ह्या मर्यादित सुविधांमुळे / उपलब्ध मर्यादित निविष्ठांमुळे शेतक-यांना हवामानाच्या लहरीपणाला तोंड देणे शक्य होत नाही. त्यामुळे त्यांना दरवर्षी पिकविमा आणि नैसर्गिक आपत्तीसंबंधी मदत यासारख्या योजनांवर अवलंबून राहावे लागते. शिवाय, विमा आणि नैसर्गिक आपत्तीतून मिळणाऱ्या मदतीतून, शेती क्षेत्रात भांडवली गुंतवणूक झाल्याची उदाहरणे क्वचितच दिसून येतात. शेतीमध्ये थेट गुंतवणूक आणि आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर केल्यास, तसेच, मागणीप्रमाणे शेतक-यांना सुविधा उपलब्ध करुन दिल्यास, उत्पादकता वाढून शेती क्षेत्रात येणा-या विविध अडचणींना तोंड देणे शक्य होईल.

वातावरण अनुकूल शेतीसाठी व शेतक-यांच्या शाश्वत विकासाकरिता, शेतक-यांना सक्षम बनविणेसाठी शेतीमध्ये भांडवली गुंतवणूक वाढवून, पायाभूत सुविधा निर्मितीवर भर देणारी नवीन योजना राबविणे आवश्यक आहे. यात कृषी यांत्रिकीकरण, आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर, पाण्याचा सुयोग्य व किफायतशीर वापर करण्यासाठी शेततळे, सूक्ष्म सिंचन, ठिबक / तुषार सिंचन यासारख्या बाबींवर भर, नियंत्रित शेतीसाठी शेडनेट, हरितगृह, पॉलीहाऊस, संरक्षित शेती, प्लास्टिक अस्तरीकरण, मल्चींग पेपर, क्रॉप कव्हर, काटेकोर शेती (precision farming), पॅक हाऊस, गोडाऊन, कोल्ड स्टोरेज, काढणी पश्चात व्यवस्थापन, कृषि प्रक्रिया, मूल्य साखळी विकसन, शेतमालाच्या branding, packing, साठवणूक सुविधेसाठी गोडाऊन, कोल्ड स्टोरेज, पॅक हाऊस इत्यादी सुविधा, तसेच, शेतकऱ्यांसाठी शेळी पालन, फळबाग लागवड, रेशीम उद्योग इत्यादि बाबींसाठी, नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्पाच्या धर्तीवर, प्रचलित अनुदानाच्या मर्यादेत थेट लाभ हस्तांतरण (Direct Benefit Transfer) तत्त्वावर राज्याची स्वतंत्र नवीन योजना राबविण्याबाबतच्या प्रस्तावास, दि.२९.०४.२०२५ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यास अनुलक्षून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

वातावरणातील वाढत्या बदलांमुळे येत असलेल्या विविध आपत्तींना तोंड देण्यासाठी शेतकऱ्यांना सक्षम बनविण्यासाठी, तसेच, शेतीमध्ये भांडवली गुंतवणूक वाढवून कृषी यांत्रिकीकरण, आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर, पाण्याचा सुयोग्य व किफायतशीर वापर करण्यासाठी शेततळे, सूक्ष्म सिंचन, ठिबक / तुषार सिंचन यासारख्या बाबींवर भर, नियंत्रित शेतीसाठी शेडनेट, हरितगृह, पॉलीहाऊस, संरक्षित शेती, प्लास्टिक अस्तरीकरण, मल्चींग पेपर, क्रॉप कव्हर, काटेकोर शेती (precision farming), पॅक हाऊस, गोडाऊन, कोल्ड स्टोरेज, काढणी पश्चात व्यवस्थापन, कृषि प्रक्रिया, मूल्य साखळी विकसन, शेतमालाच्या branding, packing, साठवणूक सुविधेसाठी गोडाऊन, कोल्ड स्टोरेज, पॅक हाऊस इत्यादी सुविधा, तसेच, शेतकऱ्यांसाठी शेळी पालन, फळबाग लागवड, रेशीम उद्योग इत्यादि बाबींसाठी, नानाजी देशमुख कृषी संजीवनी प्रकल्पाच्या धर्तीवर, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना, निकष व मापदंडांनुसार, थेट लाभ हस्तांतरण (Direct Benefit Transfer) तत्त्वावर सन २०२५-२६ पासून नवीन योजना राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजना अत्यल्प, अल्प भूधारक, दिव्यांग आणि महिला शेतकरी ह्यांना प्रथम प्राधान्य देऊन जिल्हानिहाय लक्षांक निश्चित करून प्रथम येणाऱ्यास प्राधान्य (first-come-first-served) ह्या तत्त्वावर थेट लाभ

हस्तांतरणाद्वारे (DBT) राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर योजनेची अंमलबजावणी करतांना, जिल्हाधिकारी स्तरावर अंतिम करण्यात आलेला जिल्हा आराखडा विचारात घेऊन कृषि व संलग्न क्षेत्रामध्ये शेतकऱ्यांच्या उत्पन्न वाढीकरिता आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करण्यात येईल. यामध्ये केंद्रशासनाच्या योजनांतर्गत ज्या घटकांसाठी राज्य योजनेतून पूरक अनुदान (Top-up) दिले जाते, ते सुरू राहील आणि केंद्र अनुदानाचा वापर झाल्यावर राज्य योजनेतून १००% योजना केंद्र शासनाच्या निकषांवर आधारित राबविण्यात येईल. योजनेअंतर्गत उपरोक्त नमूद बाबींसाठी विभागांतर्गत कार्यरत राज्य योजनांच्या, मार्गदर्शक सूचनांनुसार सदर योजना राबविण्यात येईल. तसेच, त्यासाठी नवीन योजनेत उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूदीतून आवश्यकतेनुसार अधिकचा निधी उपलब्ध करून देण्यात येईल. प्रधान सचिव (कृषि) यांच्या अध्यक्षतेखालील समिती, कोणत्या योजनेस/घटकास किती निधी उपलब्ध करून द्यावा, याबाबत त्या योजनेची/घटकाची मागणी तपासून निर्णय घेईल.

४. याशिवाय, विभागात सद्य:स्थितीत कार्यरत असलेल्या विविध योजनांमध्ये अंतर्भूत नसलेल्या घटक/बाबींसाठी, नवीन योजना तयार करण्यात येईल. योजना राबवितांना पालन करावयाची कार्यपध्दती व अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना स्वतंत्रपणे शासन निर्णयाद्वारे देण्यात येतील.

५. सदर भांडवली गुंतवणूकीसाठी सुरू करावयाच्या योजनेसाठी आवश्यक निधीची तरतूद करण्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रत्येक वर्षी आवश्यक तो निधी अर्थसंकल्पित करून देण्यात येईल.

७. योजनेसाठी दरवर्षी उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतूदीतील १% इतकी रक्कम, योजनेच्या परिणामधारक अंमलबजावणीसाठी घटकनिहाय बाबींसाठी शेतकरी, शेतकरी गट, क्षेत्रीय स्तरावरील अधिकारी/कर्मचारी व इतर घटकांचे ऑनलाईन व प्रत्यक्ष प्रशिक्षण व प्रात्यक्षिके, इ. बाबींसाठी राखीव ठेवण्यात येईल.

८. तसेच, योजनेचे तृतीय पक्षाद्वारे याद्दच्छिक मूल्यमापन (Third party evaluation on random basis) यासाठी, योजनेच्या मंजूर तरतूदीच्या ०.१% इतकी रक्कम राखीव ठेवण्यात येईल.

९. सदर योजनेसाठी नवीन लेखाशिर्ष उघडून निधी उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१०. या योजनेसाठी आयुक्त(कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे नियंत्रण अधिकारी राहतील. तसेच, सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

११. सदर योजनेची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याची जबाबदारी, आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, पुणे यांची राहील. तसेच, आयुक्त (कृषी) यांना योजनेच्या अंमलबजावणीबाबत मासिक आढावा घेऊन त्याबाबचा प्रगती अहवाल शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

१२. सदरील शासन निर्णय, नियोजन विभागाचा संदर्भ क्र.१९५/का.१४३१, दि.१५.०४.२०२५ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१८१/२०२५/व्यय-१, दि.०९.०५.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१३. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेताक २०२५०५०९१९१२२३०३६४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2025.05.09 19:14:07 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री (नगरविकास व गृहनिर्माण) यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव
५. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
६. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
७. सर्व मा.विधानसभा / मा. विधानपरिषद सदस्य
८. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
९. अप्पर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१२.प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुमविभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१३.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१४.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५.सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
१६.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७.अध्यक्ष व कार्यकारी संचालक, भारतीय कृषि विमा कंपनी, अंबादिप बिल्डिंग, कॅनॉट प्लेस, नवी दिल्ली.
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९.सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२०.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
२१.सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
२२.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा ), मुंबई.
२३.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई

२४.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा ), नागपूर
२५.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
२६.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२७.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२९.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३०. सर्व तहसिलदार
३१.सर्व तालुका कृषि अधिकारी
३२.निवडनस्ती, कार्यासन ११-अे.